**शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, कनाशी, ता. कळवण, जि. नाशिक वसतीगृह बांधकामास <u>सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवबां -२०१०/प्र.क्र.३१ /का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :२८ ऑक्टोबर, २०१०.**

**वाचा:- १) शासन निर्णय क्र. आवबां-२००६/प्र.क्र.९०/का.१७, दि. ५ जुन, २००६.**
**२) अ.अ. सा.बां.वि. नाशिक यांचे क्र. सांबामंना/प्रशा-४/५७०/२०१०, दि.२५.१.१० चे पत्र.**

**प्रस्तावना** : नाशिक जिल्हयातील कनाशी येथील शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह बांधकामास दि.५.६.२००६ च्या शासन निर्णयान्वये रु.९२,६८,९००/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. दरम्यान आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या सुचनेनुसार मुळ नकाशात बदल करुन अतिरिक्त सोयी सुविधांसह बांधकाम क्षेत्रात वाढ झाल्याने सा.बा.मंडळ, नाशिक यांनी सुधारित नकाशा तयार केला. तसेच दरसुचतील फरक, निविदा अधिक्य या बाबींमुळे बांधकाम खर्चात वाढ झाल्याने प्रशासकीय मान्यता देण्यासाठी सुधारित प्रस्ताव शासनास सादर केला. सदर प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>** : नाशिक जिल्हयातील कनाशी येथील शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह बांधकामासाठी रु. १,३५,५३,०००/- ( रु. एक कोटी पस्तीस लक्ष त्रेपन्न हजार फक्त ) इतक्या रकमेस खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सुधारित नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून सांक्षाकित करण्यात यावा.
२) सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त रकमेच्या अधिन राहून काम पुर्ण करण्यात यावे.

या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५१६, दि.१३.१०.२०१० अन्वये मान्यता दिली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१०२८२१०१०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( कैलास द. भंडलकर )**
**उप सचिव**

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण/नाशिक, जि.नाशिक.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (पूर्व ), कळवण, जि. नाशिक.
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, क्र. १ कळवण, ता.कळवण, जि. नाशिक.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कक्ष अधिकारी (इमा-२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१९) , मंत्रालय, मुंबई.
सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग,
आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ६),मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)